**सिमेंट बांध (चेक डॅम) कार्यक्रमांतर्गत सिमेंट कॉंक्रीट बंधा-यांच्या कामांसाठी निधी वितरीत करणेबाबत : जि. नाशिक (**उर्वरित महाराष्ट्र विभाग)

---

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्र.सिनाबं-२०२४/प्र.क्र.३१२/जल-४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २९ मार्च, २०२५.

**वाचा :** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४, १२ फेब्रुवारी, २०२५ व १७ मार्च, २०२५
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक कार्यालयाचे पत्र जा.क्र. लेखा शाखा/धा-०६ (२४-२५)/**२६४६**/सन २०२४, दिनांक ०१ जुलै, २०२४.
३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०८ ऑगस्ट, २०२४.

**प्रस्तावना :** सिमेंट बांध (चेकडॅम) कार्यक्रमांतर्गत बिगर आदिवासी क्षेत्रातील कामांसाठी मागणी क्र. झेडएच-५, लेखाशीर्ष ४४०२ २७९९ खाली सन २०२४-२५ मध्ये रुपये २००.०० कोटी निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. आता वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकांनुसार सुधारित अंदाजाच्या मर्यादेत योजनेखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून संदर्भीय दिनांक ०१/०७/२०२४ च्या निधी मागणी प्रस्तावामधील कामांचा शिल्लक निधी देणेबाबत खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**निर्णय :** **नाशिक** जिल्ह्याच्या सुरगाणा तालुक्यामध्ये एकूण ३८९ हेसिंक्ष निर्माण करणा-या संदर्भीय प्रस्तावातील **सिमेंट कॉंक्रीट बंधा-यांच्या** एकूण १९ कामांची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी एकूण **रुपये ६९२.६८ लक्ष (अक्षरी रुपये सहा कोटी ब्यान्नव लक्ष अडुसष्ट हजार फ़क्त)** निधी वितरित करण्यासाठी याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

२. उपरोक्त निधी पुढील अटी व शर्तींच्या अधीन वितरित करण्यात येत आहे :-

अ) वरील प्रकल्पांच्या कामांकरिता जलसंधारण महामंडळ, जिल्हा नियोजन समिती अथवा अन्य स्त्रोताकडून निधी उपलब्ध झाला असल्यास, याद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या निधीचे आहरण अथवा वितरण करण्यात येवू नये,

ब) प्रशासकीय मान्यतेच्या तसेच शासनाने मान्य केलेल्या सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीपेक्षा जास्तीचा निधी खर्च करण्यात येवू नये,

क) वरील प्रकल्पांच्या कामासाठी निधीची गरज नसल्यास, सदर निधी कोणत्याही परिस्थितीत परस्पर अन्य प्रकल्पासाठी वितरित करण्यात येवू नये,

ड) कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदर निधी तातडीने शासनाकडे प्रत्यार्पित करावा,

ई) निधी वितरणासंबंधीच्या वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करावे.

फ़) कामांच्या गुणवत्तेची खात्री करुन देयक अदा करावे व त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

३. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

४. यावर होणारा खर्च पुढील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

<u>मागणी क्रमांक</u>

झेडएच-५,
४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च,
१०२-मृदसंधारण,
(०२) (०२) सिमेंट बांध (चेकडॅम) कार्यक्रम, (४४०२ २७९९),
५३, मोठी बांधकामे”

५. उपरोक्त खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतिस्वाक्षरीत प्रती तसेच प्रकल्प पुर्णत्वाचे प्रमाणपत्र विहित मार्गाने शासनास सादर करावे.

६. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक यांची राहिल व अप्पर आयुक्त जलसंधारण, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

७. प्रस्तुत आदेश, वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेले हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले आहेत. त्यांचा संकेताक २०२५०३२९१८५४४२६०२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

RAJESH
HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.29 18:55:42 +05'30'

(रा.हे.बागडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**<u>प्रति</u>,**

१) अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक.

३) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक.
४) महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा) नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
६) मृद व जलसंधारण विभाग (जल-११) मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती / जल-४.

**<u>प्रत अग्रेषित,</u>**

१. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
३. मा. विरोधीपक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे कार्यालय.
४. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फ़त संबधित ल.सिं.(जसं) उपविभागिय अभियंता).
५. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहायक.
६. आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर.